**सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना**
**एकाकी पदांना लागू करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
शासन निर्णय, क्रमांक वेतन- ११०९/प्र.क्र.४१/सेवा ३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक - ५ जुलै, २०१०

वाचा :

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग ,क्रमांक - एसआरव्ही १०९५/प्र.क्र.१/९५/बारा, दिनांक ८ जून १९९५
२) शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक - वेतन ११९९/प्र.क्र.२/९९/सेवा ३, दिनांक २० जुलै २००१ व संबंधित शासन निर्णय
३) शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक - वेतन ११०९/प्र.क्र.४३/सेवा ३, दिनांक ३१ ऑगस्ट, २००१
४) शासन निर्णय, वित्त विभाग,क्रमांक - वेतन ११०९/प्र.क्र.४४/सेवा ३, दिनांक १ एप्रिल २०१०

**प्रस्तावना :** पदोन्नतीच्या संधी उपलब्ध असणाऱ्या कर्मचाऱ्यांना वरील अनु.क्र. ४ येथील शासन निर्णयानुसार सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्यात आली आहे. त्या आदेशात नमूद केल्याप्रमाणे एकाकी पदांवरील कर्मचाऱ्यांना या योजनेचा लाभ देण्याविषयीचे पुढील तपशीलवार आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**शासन निर्णय**

वरील क्रमांक (४) येथील शासन निर्णयान्वये कार्यान्वित असलेली सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना राज्य शासन व जिल्हा परिषदेकडील पदोन्नतीची संधी नसलेल्या तसेच एकाकी पदांना दिनांक १ ऑक्टोबर २००६ पासून पुढीलप्रमाणे लागू राहील. :-

२. (अ) **योजनेचा तपशील :** सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना कमाल वेतन बँड पी बी - ३ (रु. १५६००-३९१०० ) + ५४०० पर्यंत ग्रेड वेतन घेणाऱ्या एकाकी पदांवरील कर्मचाऱ्यांना लागु राहील. या योजनेखाली पात्र कर्मचाऱ्यांना त्यांच्या संपूर्ण सेवाकालावधीत कमाल दोन वेळा खाली दर्शविल्याप्रमाणे वेतनसंरचना मंजूर करण्यात येईल.

(ब) **योजनेचा पहिला लाभ :**

(१) वरील क्र. (१) येथील आदेशान्वये अंमलात आलेली कालबध्द पदोन्नती योजना आणि क्र. (२) येथील आदेशान्वये अंमलात आलेली सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना या योजनांखाली मंजूर करण्यात आलेले लाभ सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेखालील पहिला लाभ समजण्यात येईल.

रोटा/एच-१३७४[७०००+६०-७-१०]-१

(२) तसेच, यापुढे योजनेचा पहिला लाभ वरील क्र. (३) येथील आदेशांतील परिच्छेद २ (२) मधील तरतुदींनुसार पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे मंजूर करण्यात येईल.

| अ.क्र. | मूळ पदाचे ग्रेड वेतन (रुपये) | मूळ पदाच्या/विद्यमान ग्रेडवेतनाव्यतिरिक्त अनुज्ञेय ग्रेड वेतन (रुपये) |
|---|---|---|
| १ | २००० पर्यंत | २०० |
| २ | २००१ ते ४००० | ३०० |
| ३ | ४,००१ ते ५००० | ४०० |
| ४ | ५००१ पेक्षा जास्त मात्र ५४०० पर्यंत | ५०० |

(३) कालबध्द पदोन्नती/ सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेच्या लाभाच्या प्रयोजनार्थ विहित केलेल्या अटी व शर्ती / स्पष्टीकरणात्मक तरतूदी या योजनेखाली पहिला लाभ मंजूर करताना लागू राहतील. पहिल्या लाभासाठी गोपनीय अहवालांची सरासरी प्रतवारी " ब" ( चांगली ) असणे आवश्यक राहील.

(४) विवक्षित सेवाकालावधीनंतर, संबंधित पदाच्या कर्तव्ये व जबाबदारीत वाढ न होता, अकार्यात्मक वा तत्सम उच्च वेतनसंरचना ( Non functional pay structure) मंजूर करण्यात आलेला / येणारा लाभ हा या योजनेखालील पहिला लाभ समजण्यात येईल

(क) <u>योजनेचा दुसरा लाभ</u> :

(१) पहिल्या लाभानंतर १२ वर्षाची नियमित सेवा पूर्ण केलेल्या कर्मचा-यास खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे दुसरा लाभ मंजूर करण्यात येईल.

(२) हे लाभ मंजूर करताना कर्मचाऱ्याच्या वेतनबँड मध्ये बदल होणार नाही.

(३) हा लाभ मंजूर केल्यानंतर महाराष्ट्र नागरी सेवा ( वेतन) नियम, १९८१ च्या नियम ११(१) नुसार वेतननिश्चिती करण्यात येईल. वेतननिश्चितीसाठी विकल्प अनुज्ञेय राहील.

तक्ता

| पहिल्या लाभानंतरचे ग्रेड वेतन (रुपये) | दुसऱ्या लाभांतर्गत अनुज्ञेय अतिरिक्त ग्रेड वेतन (रुपये) |
|---|---|
| २००० पर्यंत | ३०० |
| २००१ ते ४००० | ४५० |
| ४,००१ ते ५००० | ६०० |
| ५००१ ते ५९०० पर्यंत<br>*(मूळ पदाचे ग्रेड वेतन रु.५४०० +पहिल्या लाभांतर्गत अनुज्ञेय करण्यात आलेले ग्रेड वेतन रु.५०० = ५९००)* | ७०० |

उदा :- वेतनबँड रु. ५२००-२०२०० अधिक ग्रेड वेतन रु. १९००/- या वेतनसंरचनेतील कर्मचाऱ्यास पहिला लाभ मिळाल्यास त्याचे ग्रेड वेतन रु. १९०० + २०० = २१०० इतके तर दुसऱ्या लाभांतर्गत त्या कर्मचाऱ्यांचे ( वरील तक्त्यातील अ.क्र.२ नुसार) ग्रेड वेतन रु. २१०० + ४५० = २५५० इतके होईल.

(ड) <u>योजनेच्या दुसऱ्या लाभासाठी पात्रतेच्या अटी व शर्ती</u> :

(१) पहिल्या लाभानंतर १२ वर्षांची नियमित सेवा पूर्ण होणे आवश्यक राहील.

(२) पहिल्या लाभाच्या प्रयोजनार्थ लागू असलेल्या अटी व शर्ती दुसऱ्या लाभासाठीही लागू राहतील. मात्र, गोपनीय अहवालाची सरासरी प्रतवारी " ब+ " ( निश्चित चांगली ) प्राप्त करणे आवश्यक राहील.

३. योजनेचा दुसरा लाभ दिनांक १ ऑक्टोबर २००६ पासून लागू राहील. परंतु १ ऑक्टोबर,२००६ ते ३१ मार्च,२०१० पर्यंत काल्पनिकरित्या वेतननिश्चिती करुन प्रत्यक्ष लाभ दिनांक १ एप्रिल,२०१० पासून मंजूर करण्यात येतील. मात्र दिनांक १ ऑक्टोबर, २००६ ते ३१ मार्च, २०१० पर्यंतच्या कालावधीतील थकबाकी अनुज्ञेय राहणार नाही.

४. या आदेशांनुसार यथास्थिति पहिला अथवा दुसरा लाभ मंजूर केल्यानंतर ६ वर्षांनी कर्मचाऱ्याच्या गोपनीय अहवालाची तपासणी करण्यात यावी. या ६ वर्षांतील त्याच्या गोपनीय अहवालातील त्याला अनुकुल असलेल्या कोणत्याही ३ गोपनीय अहवालांची सरासरी पहिल्या लाभाच्या प्रकरणी "ब"(चांगली) व दुसऱ्या लाभाच्या प्रकरणी "ब+" ( निश्चित चांगली) असणे आवश्यक राहील,गोपनीय अहवालांची ही सरासरी प्रतवारी प्राप्त न केल्यास तसेच, कर्मचारी वैद्यकीय अथवा अन्य कारणास्तव अपात्र ठरल्यास त्याला मंजूर करण्यात आलेला यथास्थिति पहिला अथवा दुसरा लाभ काढून घेण्यात येईल व अशा लाभांची वसूली करण्यात येईल. सदर वसुलीची संपूर्ण जबाबदारी संबंधित आस्थापना अधिकाऱ्यांची राहील.

५. संबंधित कर्मचाऱ्याचा पहिला लाभ काढून घेतला असेल तर त्यानंतरच्या पुढील प्रत्येक वर्षी त्याचा पहिला लाभ मंजूर करण्यासाठी विचार करण्यात यावा अशा कर्मचाऱ्याचा थेट दुसऱ्या लाभासाठी विचार केला जाणार नाही.

६. या योजनेखाली देण्यात आलेले लाभ काढून घेतल्यावर संबंधित कर्मचाऱ्याची वेतननिश्चिती जणू काही या योजनेचे लाभ दिले नव्हते असे समजून महाराष्ट्र नागरी सेवा ( वेतन) नियम, १९८१ मधील नियम १२ च्या तरतूदीनुसार करण्यात यावी.

७. हे आदेश केवळ राज्य शासकीय व जिल्हा परिषदांतर्गत पदोन्नतीची संधी नसलेल्या तसेच एकाकी पदांवरील कर्मचाऱ्यांना लागू राहतील. मात्र, रोजंदारीवरील, कंत्राटी तत्त्वावरील व तदर्थ (Ad-hoc) नियुक्त करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना या योजनेचा लाभ अनुज्ञेय असणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१००७०५१५३०१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शं.ग.सातपुते )
शासनाचे उप सचिव

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
सर्व विधानमंडळ सदस्य,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मंत्रालयीन सर्व विभाग
सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय
# प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
# प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
# सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
# सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
# प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
#आयुक्त, राज्य माहिती आयोग, (सर्व)
# सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
#प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/औरंगाबाद.
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,मंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषदा
महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
सिनियर रिसर्च ऑफीसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई
जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद.
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई /पुणे/ नागपूर/ औरंगाबाद /नाशिक/ अमरावती.
जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर.
मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका
कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी/देहू रोड/देवळाली/अहमदनगर
कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जिल्हा अहमदनगर
कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला
कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी
कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे
कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड
कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती
कुलसचिव, श्रीमती नाथाबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव
बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट आझाद मैदान,मुंबई १
भारतीय जनता पार्टी, सी.डी.ओ. बॅरेक नं १, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई २०.
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई - ४०० ००४.
भारतीय कम्युनिस्ट पार्टी ( मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई ४०० ०१३.
इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५.
नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०० ०२१.
वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-३)
# पत्राद्वारे